**सन २०१४-१५ मध्ये गाळप हंगाम घेतलेल्या साखर कारखान्यांस ऊस पुरविण्याऱ्या शेतकऱ्यांच्या एफआरपीची रक्कम अदा करण्यासाठी दीर्घ मुदतीचे कर्जावर व्याज अनुदान देण्याबाबत (सन २०१७-१८).**

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : ससाका-२०१८/प्र.क्र.१३०/३-स**

मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : १६ डिसेंबर, २०२१.

वाचा :-

१) भारत सरकार, खाद्य व सार्वजनिक वितरण विभाग, नवी दिल्ली यांची अधिसूचना क्र.१(५)/२०१५/एस.पी.-I, दि.२३.०६.२०१५

२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका-२०१५/प्र.क्र.२२६/३-स, दि.३०.०७.२०१५

३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका-२०१५/प्र.क्र.२२६अ/३-स, दि.०५.०९.२०१५

४) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका-२०१५/प्र.क्र.३८५/३-स, दि.०९.१२.२०१५

५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका-२०१५/प्र.क्र.३४५/३-स, दि.२१.४.२०१६

६) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक: ससाका-२०१७/प्र.क्र.६२/३-स, दिनांक २५.०३.२०१७

७) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक: ससाका-२०१८/प्र.क्र.५०/३-स, दिनांक २८.०२.२०१८

८) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक: ससाका-२०१८/प्र.क्र.५१/३-स, दिनांक १४.०३.२०१८

९) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक: ससाका-२०१८/प्र.क्र.५३/३-स, दिनांक ३१.०३.२०१८

१०) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक: ससाका-२०१८/प्र.क्र.१३०/३-स, दिनांक २८.०५.२०१८

११) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक : ससाका-२०१८/प्र.क्र.१३० भाग -२/३-स, दिनांक ३१.०३.२०१९

१२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक : ससाका-२०१८/प्र.क्र.१३० भाग -२/३-स, दिनांक ०५.१०.२०२०

१३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक : ससाका-२०१८/प्र.क्र.१३० भाग -२/३-स, दिनांक ०५.१०.२०२०

१४) शासन शुध्दीपत्रक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक : ससाका-२०१८/प्र.क्र.१३० भाग -२/३-स, दिनांक २१.१०.२०२०

१५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक : ससाका-२०१८/प्र.क्र.१३० भाग -२/३-स, दिनांक १७.०३.२०२१
१६) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक : ससाका-२०१८/प्र.क्र.१३० भाग -२/३-स, दिनांक ३१.०३.२०२१
१७) साखर आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र.साआ/कक्ष-४/अर्थ-६/सॉफ्ट लोन/व्या.अनु/ मागणी/ २०२१, दि.०२.१२.२०२१

**प्रस्तावना:**

सन २०१४-१५ च्या गाळप हंगामात कारखान्यांना ऊस पुरविणाऱ्या शेतकऱ्यांना ऊसासाठी एफआरपीची रक्कम देण्याकरिता मदत व्हावी म्हणून, केंद्र शासनाने दि.२३.०६.२०१५ रोजीच्या अधिसूचनेनुसार सॉफ्ट लोन योजना जाहीर केली. सदर योजनेस अनुलक्षून गाळप हंगाम २०१४-१५ मधील एफ.आर.पी. प्रमाणे एकूण देय ऊस किंमतीच्या ५० टक्के रक्कम दि.३०.०६.२०१५ अखेर ज्या कारखान्यांनी अदा केलेली आहे व ज्या कारखान्यांनी हंगाम २०१३-१४ व २०१४-१५ मध्ये गाळप घेतले आहे, अशा राज्यातील १४७ पात्र सहकारी व खाजगी साखर कारखान्यांना केंद्र शासनाने जाहीर केलेली योजना लागू करण्याबाबत दि. ३०.०७.२०१५ अन्वये शासन निर्णय निर्गमित करण्यात आलेला आहे. तद्नंतर फक्त सन २०१४-१५ मध्ये गाळप हंगाम घेतलेल्या २२ सहकारी व खाजगी साखर कारखान्यांसाठी राज्य शासनामार्फत व्याज अनुदानाबाबत दि. ०५.०९.२०१५ च्या शासन निर्णयान्वये निर्णय घेण्यात आला. सदर दोन्ही योजनांत न बसणाऱ्या ६ सहकारी व खाजगी साखर कारखान्यांना सॉफ्ट लोन-व्याज अनुदान योजना लागू करण्याबाबतचा शासन निर्णय दि. ०९.१२.२०१५ अन्वये घेण्यात आला. त्यानुसार संदर्भाधिन क्र.१२ व १३ येथील दि.५.१०.२०२० च्या दोन स्वतंत्र शासन निर्णयान्वये अनुक्रमे सन २०१७-१८ व सन २०१८-१९च्या शासन निर्णयान्वये पात्र असलेल्या साखर कारखान्यांना यापुर्वी अनुदान वितरित करण्यात आले आहे.

२. पूर्णा सहकारी साखर कारखाना लि. युनिट १ व युनिट २ जि. हिंगोली या दोन्ही कारखान्यांस सॉफ्ट लोन २०१५, अर्थसहाय्य योजनेअंतर्गत कर्ज अनुक्रमे रू.१०११.१२ लाख व रू.६२२.७२ लाख मंजूर झाले होते. या रकमांचा विनियोग दाखला मागणीचा प्रस्ताव साखर आयुक्त कार्यालयाकडे दि.२१.०७.२०१७ रोजी प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने त्रुटींची पूर्तता करणेबाबत प्रादेशिक सहसंचालक (साखर) नांदेड व दोन्ही कारखान्यांना साखर आयुक्त कार्यालयाकडून वेळोवेळी सूचित करण्यात आले. परंतु सदर त्रुटींची पूर्तता वेळेत न झाल्याने सदर प्रस्ताव प्रलंबित होता. याबाबतची पूर्तता प्रादेशिक सहसंचालक (साखर) नांदेड व कारखान्यांकडून माहे ऑक्टोबर २०२० मध्ये झाली व सॉफ्ट लोन २०१५, अर्थसहाय्य योजनेअंतर्गत मंजूर कर्जाचा विनियोग दाखला कारखान्यास दि.१६.१०.२०२० रोजी निर्गमित करण्यात आला.

पूर्णा सहकारी साखर कारखाना लि. युनिट १ व युनिट २, जि. हिंगोली या कारखान्यांस वर्ष २०१७-१८ मध्ये पात्र असलेली व्याज अनुदानाची रक्कम रू.९१.४० लाख व रु. ५१.४७ लाख अशी एकूण रू. १४२.८७ लाख पैकी रु. १,२०,७१,८१०/- इतकी रक्कम संदर्भाधीन अ.क्र. १६ येथील शसासन निर्णयानुसार वितरीत करण्यात आली आहे. आता वर्ष २०१७-१८ मध्ये पुर्णा सहकारी साखर कारखाना युनिट क्रमांक १ व युनिट क्रमांक २ ची पात्र असलेली उर्वरित रु. २२.१६ लाख इतकी रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सॉफ्ट लोन २०१५ योजनेंतर्गत वर्ष २०१७-१८ करिता पूर्णा सहकारी साखर कारखाना लि. युनिट १ व युनिट २ जि. हिंगोली या कारखान्यांस उर्वरित व्याज अनुदानाची अनुक्रमे रक्कम रू. १२.१६ लाख व रू. १०.०० लाख अशी एकूण रू.२२.१६ लाख इतकी रक्कम वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम **"मागणी क्रमांक-व्ही-२, २४२५ सहकार, १०८- इतर सहकारी संस्थांना सहाय्य, (०३) सहकारी साखर कारखाने, (०३) (०२) सहकारी साखर कारखान्यांना सहायक अनुदान (कार्यक्रम) (२४२५ ०९८९), ३१-सहायक अनुदाने(वेतनेत्तर)"** या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. सदर खर्च सन २०२१-२२ साठी मंजूर झालेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

पुर्णा सहकारी साखर कारखाना युनिट क्र.२ ची विक्री केली असल्यामुळे बाराशिव हनुमान कारखान्याकडील शासनास येणे बाकी असलेल्या मुद्दल व व्याज असे एकूण रू.७४३.०० लक्ष परतफेडीची जबाबदारी पूर्णा सहकारी साखर कारखाना यांनी घेतली आहे. त्यामुळे साखर आयुक्त यांनी पुर्णा सहकारी साखर कारखाना यांचेकडून याबाबतचे हमीपत्र घेऊन यापूर्वी संदर्भाधीन क्र.क्र.१६ येथील दिनांक ३१.३.२०२१ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेली व या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात येणारी तरतुद पुर्णा सहकारी साखर कारखान्यास उपलब्ध करून दयावी व वित्त विभागाने नंतर कळविल्यानुसार योग्य त्या लेखाशिर्षात सदर रक्कम जमा करण्याची कार्यवाही करावी .

३. प्रस्तुत प्रकरणी लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे यांना "आहरण व संवितरण अधिकारी" व संचालक (अर्थ), साखर आयुक्तालय, साखर संकुल, पुणे यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यानुसार लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे यांनी त्या-त्या साखर कारखान्यांच्या बँकेला व्याज अनुदानाबाबत, निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील अटी व शर्तीच्या अनुषंगाने निधी वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

४. आहरण व संवितरण अधिकारी व नियंत्रण अधिकारी यांनी सदर तरतूद वितरीत करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियमपुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/ विनियम भाग -२, दिनांक १७.०४.२०१५ व वित्त विभाग शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/ प्र.क्र.४८/ अर्थ-३, दिनांक १४.१०.२०२१ मधील अटी व शर्तीचे तसेच वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्याची दक्षता घ्यावी.

५. सदरहू शासन निर्णय, वित्त विभाग शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/ प्र.क्र.४८/ अर्थ-३, दिनांक १४.१०.२०२१ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३३५/२०२१/व्यय-२, दिनांक ३०.०६.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२१६१०४३३१३४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Prashant Ramesh Pimpale

Digitally signed by Prashant Ramesh Pimpale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fa29ab2a9a96d3a62a7a97531711f1ef9f3e78de039be6cabb44929032069507, serialNumber=c9fc0e76e90819f7f6d29d043a3e393d7982322683a082d04eda26b7264e4837, cn=Prashant Ramesh Pimpale
Date: 2021.12.16 10:44:16 +05'30'

**( प्रशांत र. पिंपळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे (३ प्रती)
२) महालेखापाल -१, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) मुंबई.
३) महालेखापाल -२, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) नागपूर
४) लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
६) संचालक (प्रशासन), साखर आयुक्तालय, साखर संकुल, पुणे.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
८) लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे (३प्रती)
९) सर्व प्रादेशिक सहसंचालक (साखर)
१०) सर्व लेखापरीक्षक (साखर)
११) वित्त विभाग (व्यय-२)/ कराधान-३/ अर्थसंकल्प-१२ (अर्थोपाय शाखा), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१२) कार्यासन क्रमांक १६-स/ १७-स/ २२-स/ २५-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) सह संचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालय, मुंबई.
१४) कक्ष अधिकारी, १६-स तथा वेब को-ऑर्डिनेटर, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) निवड नस्ती ( ३-स).